रिट याचिका क्र.२५६०/२०२१ व ४४५६/२०२१, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिकेतील याचिकाकर्त्यांचे उच्च माध्यमिक शाळातील रिक्त पदावर मान्यता देऊन समायोजन करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्रमांक : विभशा-२०२०/प्र.क्र.६३०/विजाभज-२
इतर मागास बहुजन कल्याण विभाग
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २३ मार्च, २०२२

वाचा-

१. शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.विभशा-२००६/ प्र.क्र.५९/ मावक-६, दिनांक २६ जून, २००८.
२. शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.विभशा-२००६/ प्र.क्र.९९/मावक-६, दिनांक ३१ ऑगस्ट, २००९.
३. शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.विभशा-२०२९/ प्र.क्र.४७/विजाभज-२, दिनांक २१ जानेवारी,२०१३ व शुध्दीपत्रक दि.२४/०१/२०१३.
४. शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.विभशा-२००९/ प्र.क्र.४७/विजाभज-२, दिनांक ८ फेब्रुवारी,२०१३.
५. शासन निर्णय विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.विभशा-२०१८/ प्र.क्र.७१/विजाभज-२, दिनांक २८ मार्च,२०१८.
६. शासन निर्णय विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.विभशा-२०१३/ प्र.क्र.१३०/विजाभज-२, दिनांक ३ ऑगस्ट,२०१८.
७. शासन निर्णय विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग क्र.विभशा-२०१९/ प्र.क्र.८६१/विजाभज-२, दिनांक ०९ सप्टेंबर,२०१९
८. शासन परिपत्रक इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.विभशा-२०१९/ प्र.क्र.३२९/विजाभज-२, दिनांक १३ मार्च, २०२०.
९. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे रिट याचिका क्र.२५६०/२०२१ व ४४५६/२०२१ मधील दि. २४ फेब्रुवारी,२०२२ चे आदेश.

**प्रस्तावना :-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत विमुक्त जाती भटक्या जमाती प्रवर्गाच्या मुला-मुलींसाठी अस्तित्वात असलेल्या माध्यमिक शाळेमधून पात्र माध्यमिक शाळांची निवड करुन कनिष्ठ महाविद्यालय/उच्च माध्यमिक आश्रमशाळा सन २००७-०८ पासून अनुदानित तत्वावर श्रेणीवाढ करण्याबाबत दि.३०.०५.२००७ रोजीच्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार शासन निर्णय संदर्भ क्र.१ दि.२६.६.२००८ अन्वये १२५ व शासन निर्णय संदर्भ क्र.०२

दि.३१.८.२००९ अन्वये २३, अशा एकूण १४८ कनिष्ठ महाविद्यालय/उच्च माध्यमिक आश्रमशाळांना मान्यता देण्यात आली आहे. उच्च माध्यमिक आश्रमशाळांसाठी शासन निर्णय दि.२६/०६/२००८ मधील परिच्छेद क्र.३ नुसार पुढीलप्रमाणे मान्य कर्मचारी संख्या (शिक्षक/शिक्षकेतर) व कर्मचाऱ्यांची शैक्षणिक अर्हता नमूद करण्यात आलेली आहे.

| **एक विद्याशाखा असेल तर** | **दोन विद्याशाखा असेल तर (कला व वाणिज्य/ कला व विज्ञान)** |
| --- | --- |
| ०४ शिक्षक-०१ इंग्रजी विषयासाठी<br>०१ मराठी विषयासाठी<br>०२ विशेष विषयांसाठी | ०६ शिक्षक-०१ इंग्रजी विषयासाठी<br>०१ मराठी विषयासाठी<br>०२+०२= ०४ विशेष विषयांसाठी |
| शिक्षकेतर कर्मचारी:-i) प्रत्येक कनिष्ठ महाविद्यालयासाठी ८० निवासी विद्यार्थ्यांसाठी ०१ स्वयंपाकी अनुज्ञेय होईल. म्हणजेच पहिल्या वर्षी स्वयंपाकी पद अनुज्ञेय होणार नाही. दुसऱ्या वर्षापासून अनुज्ञेय होईल.<br>ii) विज्ञान शाखा असल्यास एक प्रयोगशाळा सहाय्यक अनुज्ञेय होईल.<br>टिप:-सध्या माध्यमिक आश्रमशाळेमध्ये कार्यरत असलेला प्रयोगशाळा परिचर हा कर्मचारी H.S.C.(१२ वी) उत्तीर्ण असेल तेथे प्रयोगशाळा सहाय्यक हे पद अनुज्ञेय होणार नाही. | |

उपरोक्त आकृतीबंधानुसार राज्यातील एकूण १४८ उच्च माध्यमिक आश्रमशाळांना (कनिष्ठ महाविद्यालय) खालीलप्रमाणे पदे निर्धारीत करुन देण्यात आली होती.

| अ.क्र. | पदाचे नाव | उच्च माध्यमिक आश्रमशाळांची संख्या | दि.२६/६/२००८ च्या शासन निर्णयानुसार आश्रमशाळानिहाय निर्धारीत केलेली पदे | एकूण पदसंख्या |
| --- | --- | --- | --- | --- |
| ०१ | उच्च माध्यमिक शिक्षक | १४८ | ०६ | ८८८ |
| ०२ | स्वयंपाकी | १४८ | ०१ | १४८ |
| ०३ | प्रयोगशाळा परिचर (विज्ञान शाखेकरीता) | १४१ | ०१ | १४१ |
| | **एकूण** | | | **११७७** |

२. शासन निर्णय संदर्भ क्र.०१ दि.२६/०६/२००८ अन्वये उच्च माध्यमिक आश्रमशाळांसाठी मंजूर केलेल्या उपरोक्त आकृतिबंधाशिवाय विज्ञान शाखेसाठी वाढीव ०२ पदे निर्माण करण्याबाबत तत्कालीन संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, पुणे यांनी दि.७/०२/२०१४ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या आधारे १४८ उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या ११७७ पदांव्यतिरिक्त विज्ञान शाखेसाठी वाढीव ०२ पदे विचारात घेऊन एकूण १४५९ पदांचा पुढील प्रस्ताव तत्कालीन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत उच्चस्तर सचिव समितीच्या दि.२०/०४/२०१५ च्या बैठकीत सादर करण्यात आला होता.

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>एकूण कनिष्ठ महाविद्यालय</th><th>पदांचे नाव</th><th>प्रत्येकी पदे</th><th>एकूण पदे</th></tr>
<tr><td>१.</td><td rowspan="2">१४८</td><td>शिक्षक-कला व विज्ञान</td><td>१४१X८=११२८</td><td rowspan="2">११७०</td></tr>
<tr><td>२.</td><td>शिक्षक-कला व वाणिज्य</td><td>०७X०६=४२</td></tr>
<tr><td></td><td>१४१</td><td>प्रयोगशाळा परिचर</td><td>१४१</td><td>१४१</td></tr>
<tr><td>३.</td><td>१४८</td><td>स्वयंपाकी</td><td>१४८</td><td>१४८</td></tr>
<tr><td colspan="4">एकूण</td><td>१४५९</td></tr>
</table>

सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने उच्चस्तर समितीने पुढील अभिप्राय नोंदवून प्रस्तावास मान्यता दिलेली नाही.

मा.मंत्रीमंडळाच्या दि.३० मे, २००७ च्या बैठकीत ५० आश्रमशाळांना कनिष्ठ महाविद्यालय सुरु करण्यास मान्यता देण्याचा निर्णय घेण्यात आला. आता विभागाने ५० आश्रमशाळांऐवजी १४८ आश्रमशाळांच्या कनिष्ठ महाविद्यालयासाठी पदे मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यामुळे विभागाने १४८ आश्रमशाळातील कनिष्ठ महाविद्यालयांना मान्यता व त्याअनुषंगाने पदनिर्मितीचा प्रस्ताव खाली नमूद केलेल्या मुद्यांच्या तपशीलासह व त्याबाबतच्या वित्तिय भाराच्या माहितीसह मा.मंत्रीमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करावा.

१. सदर कनिष्ठ महाविद्यालयांमध्ये कर्मचारीवृंद भरती करण्यासंदर्भात कोणकोणत्या वर्तमानपत्रात जाहिरात दिली होती.
२. त्यानुसार किती उमेदवारांचे अर्ज प्राप्त झाले होते.

३. निवड प्रक्रियेत त्यापैकी किती उमेदवार पात्र ठरले होते, त्या उमेदवारांना किती गुण प्राप्त झाले होते.

४. शासनाच्या प्रचलित कार्यपध्दतीनुसार उमेदवारांची निवड केली होती का? उदा.बिंदुनामावली/राखीव प्रवर्ग इ.

५. निवड केलेल्या उमेदवारांमध्ये संस्थाचालकांच्या जवळच्या नातेवाईकांचा समावेश नाही असे प्रमाणपत्र.

उपरोक्त प्रस्तावास मंत्रीमंडळाची मान्यता प्राप्त झाल्यास पुन्हा उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेची आवश्यकता राहणार नाही.

सदर पदनिर्मितीच्या प्रस्तावास अद्याप उच्चस्तर समिती/मा.मंत्रीमंडळाची मान्यता प्राप्त झालेली नाही.

३. शासन निर्णय संदर्भ क्र.१ व २ अन्वये मंजूर केलेल्या उच्च माध्यमिक आश्रमशाळा सुरु करण्यामध्ये येत असलेल्या अडचणींचे निराकरण करण्यासाठी शासन निर्णय संदर्भ क्र.०३ दि.२१/०१/२०१३ अन्वये मागर्दशक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. सदर शासन निर्णयातील अ.क्र.ब)७) येथे खालीलप्रमाणे तरतूद नमूद आहे.

"उच्च माध्यमिक आश्रमशाळेसाठी उच्च माध्यमिक शाळा संहितेप्रमाणे शिक्षक कर्मचारी अनुज्ञेय राहतील. (मूळ शासन निर्णयातील परिच्छेद ३ मधील (अ) व (ब) मधील टिप लागू राहणार नाही.)"

म्हणजेच उक्त प्रस्तावनेतील परिच्छेद क्र.०१ मध्ये नमूद दि.२६/०६/२००८ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.०३ मधील ब)i) येथे खालीलप्रमाणे टिप नमूद आहे.

ब) कर्मचाऱ्यांची शैक्षणिक अर्हता-
i) शिक्षकांसाठी शैक्षणिक पात्रता खालीलप्रमाणे निश्चित करण्यात यावी:-
मराठी शिक्षक - एम.ए., बी.एड.
इंग्रजी शिक्षक - एम.ए., बी.एड.
टिप:-सध्या कार्यरत असलेल्या माध्यमिक आश्रमशाळेमध्ये M.A., B.Ed मराठी विषय, M.A., B.Ed इंग्रजी विषय द्वितीय श्रेणीने उत्तीर्ण झालेले शिक्षक कार्यरत असतील अशा ठिकाणी कनिष्ठ महाविद्यालयाकरीता नवीन मराठी व इंग्रजी विषयाकरीता शिक्षक मान्य होणार नाहीत. येथे कार्यरत असलेल्या M.A., B.Ed मराठी/ M.A., B.Ed इंग्रजी द्वितीय श्रेणी अर्हता असणाऱ्या शिक्षकांकडून कनिष्ठ महाविद्यालयातील इंग्रजी/मराठी विषय शिकविले जातील अशा पध्दतीने त्यांचा कार्यभार निश्चित करावा.

उक्त टिपनुसार उच्च माध्यमिक आश्रमशाळेसाठी मंजूर ०६ पदांपैकी मराठी व इंग्रजी विषयासाठी आवश्यक शैक्षणिक अर्हताधारक शिक्षक माध्यमिक विभागात उपलब्ध असल्यास उच्च माध्यमिक आश्रमशाळेसाठी मराठी व इंग्रजी विषयासाठी स्वतंत्र शिक्षक उपलब्ध होणार नाहीत. म्हणजेच ज्या संस्थेतील माध्यमिक आश्रमशाळेत मराठी व इंग्रजी विषयशिक्षक एम.ए.,बी.एड अर्हताधारक असतील त्या कला व विज्ञान उच्च माध्यमिक आश्रमशाळेस शासन निर्णय दि.२६/०६/२००८ च्या परिच्छेद क्र.०३ मधील (अ) व (ब) येथे नमूद टिपनुसार ०६ऐवजी ०४ शिक्षक उपलब्ध होतील असे स्पष्ट होते, तथापि, शासन निर्णय दि.२१/०१/२०१३ अन्वये शासन निर्णय दि.२६/०६/२००८ च्या परिच्छेद क्र.०३ मधील (अ) व (ब) येथे नमूद टिप वगळण्यात आल्यामुळे कला व विज्ञान महाविद्यालास मराठी व इंग्रजी विषयासाठी स्वतंत्र शिक्षक उपलब्ध झाल्याने सदर संख्या ०४ ऐवजी ०६ झाली म्हणजेच शासन निर्णय दि.२१/०१/२०१३ अन्वये शासन निर्णय दि.२६/०६/२००८ च्या परिच्छेद क्र.०३ मधील टिप -अ॰ व -ब॰ वगळण्यात आली असली तरी, दि.२६/०६/२००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर ०६ शिक्षक पदांच्या आकृतीबंधामध्ये कोणताही बदल झालेला नाही, ही वस्तुस्थिती आहे. शिवाय दि.२१/०१/२०१३ च्या शासन निर्णयातील उपरोक्त तरतूदीनुसार दोन विद्या शाखा असलेल्या उच्च माध्यमिक आश्रमशाळेसाठी किती शिक्षकांची पदे अनुज्ञेय आहेत, याबाबत कोणताही उल्लेख नाही किंवा याबाबत माध्यमिक अथवा उच्च माध्यमिक आश्रमशाळा संहितेमध्ये उच्च माध्यमिक शाळेतील पदांचा स्पष्ट उल्लेख नाही. असे असतानाही दि.२१/०१/२०१३ मधील परिच्छेद क्र.०७ मधील तरतुदीचा चुकीचा अर्थ लावून दोन विद्याशाखा असलेल्या उच्च माध्यमिक आश्रमशाळा चालविणाऱ्या १४१ संस्थापैकी काही संस्थांनी त्यांच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळेच्या विज्ञान शाखेत पदमान्यता नसतांना वाढीव ०२ शिक्षकांची नियुक्ती केली होती. सदर नियुक्त्या करतांना शासन मान्यतेची कोणतीही प्रक्रीया पूर्ण केली नाही. संस्थास्तरावर अशा नियमबाह्य नियुक्त पुढील शिक्षकांनी त्यांच्या नियुक्तीस मान्यता देवून वेतन मिळण्यासाठी मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र.८६१४/२०१७ दाखल केली होती.

| याचिकाकर्ता शिक्षकांची नावे | खंडपीठ/याचिका क्रमांक |
|---|---|
| श्री.महेश पावले, श्री.उत्तम कांबळे, श्रीमती स्वाती चामवाड, श्री.अमोल बायस, श्री.भटू नाटू पाटील, श्री.स्वामी चनबसवेश्वर मुरगेंद्र, श्री.विनायक राजमाने, श्री. दत्तात्रय बाळू पवार, श्रीमती सीमा पाटील, श्री.रमेश एल.गंगाधर, श्री.शशिधर रेड्डी सोमा, श्री.सुनिल लांडगे,श्री.गिरीश शिंपी, श्रीमती सविता लिमगुडे,श्री. कैलास जवळके, श्री.नवनाथ वाडेवाले, श्री.श्रीकांत पाटील, श्री.रविंद्र राठोड, श्री.संभाजी कदम | मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद रिट याचिका क्र.८६१४/२०१७ |

उक्त याचिका क्र.८६१४/२०१७ मध्ये याचिकाकर्ता असलेले श्री.महेश पावले यांचे माध्यमिक आश्रमशाळा,बोरतळा पाटी, ता.उदगीर, जि.लातूर येथे माध्यमिक शिक्षक म्हणून संबंधित संस्थेने नियुक्ती दिली आहे. तसेच श्री.उत्तम कांबळे हे उच्च माध्यमिक आश्रमशाळा,बोरतळा पाटी, ता.उदगीर, जि.लातूर येथे सेवेत नाहीत, असे प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, लातूर यांनी प्रमाणित केले आहे. त्याचप्रमाणे श्री. श्रीकांत पाटील यांनी सेवेचा राजीनामा दिला असल्याचे संबंधित सहाय्यक आयुक्त व संस्था यांनी प्रमाणित केले आहे.

उक्त याचिकेवर दि.१९/०३/२०१९ रोजी मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांनी खालीलप्रमाणे आदेश पारित केले आहेत.

"In view of the aforesaid Government Resolution, the petition is disposed of with liberty to the petitioners to pursue the respective state authority like District Social Welfare Officer for accommodation/approval of these petitioners in the Ashram Schools against the subjects as stated in the said Resolution. If the petitioner submit their claims either personally or through the Institute for grant of approval and payment of salary to the respective authority of the State Government, the authority to consider these claims, as expeditiously as possible, needless to state on their own merits."

४. मा.उच्च न्यायालयाच्या उक्त निर्णयाच्या आधारे रिट याचिका क्र.८६१४/२०१७ मधील याचिकाकर्त्यांनी त्यांच्या नियुक्तीस मान्यता देऊन व वेतन मिळण्यासाठी संबंधित सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचेकडे कार्यरत संस्थामार्फत प्रस्ताव सादर केले होते. परंतु शासन निर्णय दि.२६/०६/२००८ नुसार ०६ शिक्षकांची पदे मंजूर असून विज्ञान शाखेसाठी ०२ वाढीव पदे मंजूर करणेबाबत शासन स्तरावरुन कोणताही निर्णय झालेला नसल्याने, संबंधित सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांनी पुढील याचिकाकर्ता शिक्षकांच्या नियुक्तीस मान्यता देण्याबाबतची विनंती अमान्य केली आहे.

१) श्रीमती स्वाती चामवाड, २) श्री.अमोल बायस, ३) श्री.भटू नाटू पाटील, ४) श्री.स्वामी चनबसवेश्वर मुरगेंद्र, ५) श्री.रमेश एल.गंगाधर, ६) श्री.शशिधर रेड्डी सोमा, ७) श्री.सुनिल लांडगे, ८)श्री. कैलास जवळके, ९) श्री.नवनाथ वाडेवाले, १०)श्री.रविंद्र राठोड, ११) श्री.संभाजी कदम

तद्नंतर उक्त याचिकाकर्त्याप्रमाणे नियमबाह्य नियुक्त शिक्षकांनी नियुक्तीस मान्यता मिळण्यासाठी मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद, नागपूर येथे दाखल याचिकांतील

निर्णयानुसार संबंधित सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचेकडे दाखल प्रस्ताव देखील पद मंजूर नसल्याच्या वरील कारणास्तव अमान्य केले आहेत.

तथापि, मा.उच्च न्यायालयाच्या उक्त निर्णयाच्या आधारे तत्कालीन प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, पुणे यांनी रिट याचिका क्र.८६१४/२०१७ मध्ये याचिकाकर्ता असलेल्या याचिकाकर्त्यांपैकी पुढील शिक्षकांच्या नियुक्तीस रकाना क्र.०४ मध्ये नमूद केलेल्या आदेशान्वये मान्यता दिली.

<table>
<tr><th>अक्र</th><th>आश्रमशाळेचे नाव</th><th>सहशिक्षकाचे नाव</th><th>मान्यतेचा आदेश क्रमांक</th></tr>
<tr><th>१</th><th>२</th><th>३</th><th>४</th></tr>
<tr><td>१.</td><td rowspan="2">उच्च माध्यमिक आश्रमशाळा, मुखाई, ता.शिरुर, जि.पुणे</td><td>सौ. सीमा भारत पाटील</td><td rowspan="2">प्राउआसकपुणे/आशा/क.महा.मान्यता/शिक्षक/१९-२०/२८८५, दि.५/०९/२०१९</td></tr>
<tr><td>२.</td><td>सौ.सविता संदीप लीमगुडे</td></tr>
<tr><td>३.</td><td rowspan="2">कला व विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, बालाजीनगर, ता.मंगळवेढा, जि.सोलापूर</td><td>श्री.विनायक बाबुराव राजमाने</td><td>प्राउआसकपुणे/आशा/क.महा.मान्यता/शिक्षक/ १९-२०/४०८०, दि.११/१२/२०१९</td></tr>
<tr><td>४.</td><td>श्री.गिरीश गंगाधर शिंपी</td><td>प्राउआसकपुणे/आशा/क.महा.मान्यता/शिक्षक/ १९-२०/४०७९, दि.११/१२/२०१९</td></tr>
<tr><td>५.</td><td>कनिष्ठ महाविद्यालय, येड्राव, ता.मंगळवेढा, जि.सोलापूर</td><td>श्री.दत्ता बाळू पवार</td><td>प्राउआसकपुणे/आशा/क.महा.मान्यता/शिक्षक/ १९-२०/४०७८, दि.११/१२/२०१९</td></tr>
</table>

वरील शिक्षकांना नियमबाह्यरित्या मान्यता दिल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आल्यानंतर ०२ वाढीव पदांना शासनाची मान्यता नसल्याच्या कारणास्तव या शिक्षकांचे वेतन शासन परिपत्रक संदर्भ क्र.१२ दि.१३/०३/२०२० अन्वये बंद करण्यात आले. सबब, या पाच शिक्षकांनी वेतन सुरु करुन थकीत वेतन मिळण्यासाठी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र.२५६०/२०२१ व रिट याचिका क्र.४४५६/२०२१ दाखल केल्या आहेत.

उपरोक्त याचिकेवर दि.७/१२/२०२१ रोजी मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या अंतरीम निर्णयाच्या अनुषंगाने शासन निर्णय, दि.२६/०६/२००८ अन्वये मंजूर ०६ पदांच्या आकृतीबंधाच्या मर्यादेत याचिकाकर्त्यांबाबत सहानुभुतीपुर्वक विचार करुन त्यांचे शासन निर्णय दि.३/०८/२०१८ मधील तरतुदीनुसार समायोजन करण्यात येईल, असे शपथपत्र शासनाच्या वतीने मा.उच्च न्यायालय मुंबई येथे

दि.११/०२/२०२२ रोजी दाखल करण्यात आले आहे. तद्‌नंतर सदर याचिकेवर दि.२४/०२/२०२२ रोजी सुनावणी होऊन मा.उच्च न्यायालयाने खालीलप्रमाणे आदेश दिले आहेत

"The Petition therefore deserves to be allowed and the same is allowed accordingly. The impugned letter is hereby quashed and set aside. The Respondent Nos. १ to ४ are directed to release the arrears of salary and start paying salary regularly to the Petitioners in accordance with law. Arrears of salary shall be released within a period of four weeks from the date of the receipt of the order."

मा.उच्च न्यायालयाने उक्त निर्णयाद्वारे याचिकाकर्त्यांना नियमानुसार नियमित वेतन देवून त्यांच्या वेतनाची थकबाकी ४ आठवड्यात वेतन अदा करण्याबाबत आदेशित केले आहे.

६. उच्च माध्यमिक आश्रमशाळेच्या विज्ञान शाखेस वाढीव ०२ पदे मंजूर करण्याबाबतच्या विभागाच्या प्रस्तावास उच्चस्तर समितीची अथवा मा.मंत्रीमंडळाची मान्यता नसल्याने अशी पदे निर्माण करण्याबाबत शासन स्तरावर अद्याप कोणताही निर्णय झालेला नाही, ही वस्तुस्थिती आहे.

तथापि, रिट याचिका क्र.२५६०/२०२१ व ४४५६/२०२१ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या उक्त निर्णयाच्या पार्श्वभूमीवर संबंधित शिक्षकांची दिर्घकाळ झालेल्या सेवेचा विचार करुन शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट-अ मधील उक्त याचिकेतील अ.क्र.१ ते ५ येथे नमूद याचिकाकर्त्या शिक्षकांच्या नियुक्तीस मान्यता देण्यात येत आहे. सदर शिक्षक सध्या कार्यरत असलेल्या आश्रमशाळेतून एक विशेष बाब म्हणून त्यांचे नियमित वेतन सुरु करावे. तसेच परिच्छेद क्र.०४ मधील तक्त्यांतील रकाना क्र.०४ च्या मान्यतेनुसार ज्या कालावधीपासून संबंधितांचे वेतन रोखून ठेवण्यात आले ते पुर्ववत सुरु करावे. आणि रोखून ठेवलेल्या वेतनाच्या दिनांकापासून या आदेशाच्या दिनांकापर्यंतच्या थकीत वेतनाची नियमानुसार परिगणना करुन थकीत वेतनाचा प्रस्ताव संबंधित सहाय्यक आयुक्तांनी शासन मान्यतेसाठी सादर करावा. तद्‌नंतर या शिक्षकांचे शासन निर्णय, दि.२६/०६/२००८ नुसार मंजूर ०६ पदांच्या आकृतीबंधाच्या मर्यादेत शासन निर्णय दि.३/०८/२०१८ संदर्भ क्र.०६ मधील तरतुदीनुसार अन्य उच्च माध्यमिक आश्रमशाळेमध्ये रिक्त असलेल्या पदावर तातडीने समायोजन करण्याची कार्यवाही प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, पुणे यांनी करावी.

७. असेही आदेशित करण्यात येते की, उक्त रिट याचिका क्र.२५६०/२०२१ व ४४५६/२०२१ मधील याचिकाकर्त्यांसोबत मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथील मूळ रिट याचिका क्र. ८६१४/२०१७ मध्ये याचिककर्ता असलेल्या तसेच मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिका क्र.३०६७१/२०१९, २८८९/२०२०, ३२४०/२०२० व खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट याचिका क्र.१२३४६/२०१६ व ११८००/२०१९ आणि ११२५/२०२१ आणि मा.उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ नागूपर

येथे दाखल रिट याचिका क्र.१०४५/२०२१ मध्ये समाविष्ट सदर शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील अ.क्र.६ ते २२ येथील याचिकाकर्त्यां सहशिक्षकांबाबत मा.उच्च न्यायालय मुंबई यांच्या उक्त निर्णयाच्या आधारे एक अपवादात्मक प्रकरण म्हणून त्यांच्या नियुक्तीस देखील मान्यता देऊन त्यांना -एक विशेष बाब॰ म्हणून सध्या कार्यरत असलेल्या आश्रमशाळेवर त्यांचे नियमित वेतन सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर मान्यतेनुसार अ.क्र.६ ते २२ वरील सदर शिक्षकांच्या मूळ नियुक्तीपासून ते याआदेशाच्या दिनांकापर्यंत त्यांना अनुज्ञेय होणाऱ्या वेतनाची नियमानुसार परिगणना करुन थकीत वेतनाचा प्रस्ताव संबंधित सहाय्यक आयुक्तांनी शासनास मान्यतेसाठी सादर करावा. तद्नंतर तातडीने संबंधित शिक्षकांचे शासन निर्णय दि.२६/०६/२००८ नुसार मंजूर ०६ पदांच्या आकृतिबंधाच्या मर्यादेत अन्य उच्च माध्यमिक आश्रमशाळेमध्ये रिक्त असलेल्या पदावर शासन परिपत्रक संदर्भ क्र.८ दि.३/०८/२०१८ मधील तरतुदीनुसार समायोजन करण्याची कार्यवाही संबंधित प्रादेशिक उपायुक्तांनी करावी.

०८. उक्त रिट याचिकांमध्ये याचिकाकर्ता असलेल्या तथापि, तांत्रिक कारणाने त्यांच्या नियुक्तीच्या अनुषंगाने माहिती उपलब्ध नसलेल्या काही शिक्षकांनी नावे या आदेशात अंतर्भुत झालेली नाहीत. तथापि, सदर शिक्षकांचा सर्व सेवा तपशिल (मुळ नियुक्ती दिनांक, शैक्षणिक अर्हता इ.) उपलब्ध झाल्यानंतर त्यांच्या मान्यतेबाबत स्वतंत्रपणे निर्णय घेण्यात येईल.

०९. या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट -अ॰ मध्ये नमूद शिक्षकांची उच्च माध्यमिक आश्रमशाळेतील गणित व विज्ञान विषयासाठी आवश्यक असलेली शैक्षणिक अर्हता धारण केली आहे किंवा कसे याबाबत संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग यांनी खात्री करुनच उपरोक्त परिच्छेद क्र.०७ नमूद केल्यानुसार वेतन व अनुषंगिक कार्यवाही करावी. ज्या शिक्षकांच्या शैक्षणिक अर्हतेबाबत अडचणी/शंका असतील अशी प्रकरणे तातडीने शासनाच्या निदर्शनास आणावी व शासनाचे सुस्पष्ट आदेश घेऊनच यासंदर्भात पुढील कार्यवाही करावी.

१०. भविष्यात उच्च माध्यमिक आश्रमशाळेच्या विज्ञान शाखेसाठी वाढीव पदांना शासनाच्या वित्त विभाग, नियोजन विभाग तसेच उच्चाधिकार समिती/मा.मंत्रीमंडळाची मान्यता मिळाल्यास सोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद शिक्षकांना त्यांच्या मूळ आश्रमशाळेवर नियुक्ती देण्याबाबत निर्णय घेण्यात येईल.

११. सदर प्रकरण एक अपवादात्मक प्रकरण असून अन्य प्रकरणी पुर्वोदाहरण म्हणून विचारात घेता येणार नाही.

१२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३३०१८४११५५६३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: CN = KAILAS TARACHAND SALUNKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT
Date: 2022.03.30 18:45:09 +05'30'

**(कैलास साळुंके)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत माहितीस्तव :-**

१) मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव.
३) मा.अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) यांचे स्वीय सहाय्यक.
४) मा.अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहाय्यक.
५) मा. अपर मुख्य सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग (सर्व).
९) सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण (सर्व).
१०) कार्यासन अधिकारी (विजाभज-१ ते ३), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती- विजाभज-२.

**शासन निर्णय इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक : विभशा-२०२०/प्र.क्र.६३०/विजाभज-२, दिनांक- २३ मार्च,२०२२ सोबतचे परिशिष्ट-अ**

**(मा.उच्च न्यायालयाच्या दि.२४/०२/२०२२ च्या निर्णयानुसार मूळ आस्थापनेवर नियमित वेतन सुरु करुन थकीत वेतनाचा प्रस्ताव शासनास सादर करणे. तद्नंतर दि.२६/०६/२००८ च्या शासन निर्णयामध्ये नमूद आकृतिबंधातील ०६ पदांच्या मर्यादेत शासन परिपत्रक संदर्भ क्र.८ दि.३/०८/२०१८ मधील तरतुदीनुसार अन्य आश्रमशाळेतील रिक्त पदावर मान्यतेने समायोजन करावयाच्या कर्मचाऱ्यांची यादी.)**

| अ.क्र. | शिक्षकाचे नाव | सध्या कार्यरत आश्रमशाळेचे नाव |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| १. | श्रीमती सीमा भारत पाटील | उच्च माध्यमिक आश्रमशाळा, मुखाई, ता.शिरुर, जि.पुणे |
| २. | सौ.सविता संदीप लीमगुडे | |
| ३. | श्री.विनायक बाबुराव राजमाने | कला व विज्ञान कनिष्ठ महाविद्यालय, बालाजीनगर, ता.मंगळवेढा, जि.सोलापूर |
| ४. | श्री.गिरीश गंगाधर शिंपी | |
| ५. | श्री.दत्ता बाळू पवार | कनिष्ठ महाविद्यालय, येड्राव, ता.मंगळवेढा, जि.सोलापूर |
| ६. | श्री.कैलास भगवान जवळके | उच्च माध्यमिक आश्रमशाळा, मोजमाबाद, ता.पालम, जि.परभणी |
| ७. | श्री.सुनील ओंकार लांडगे | उच्च माध्यमिक आश्रमशाळा, बनवस, ता.पालम, जि.परभणी |
| ८. | श्री.नवनाथ संभाजी वडेवाले | |
| ९. | श्री.भटू नाटू पाटील | उच्च माध्यमिक आश्रमशाळा, गाळण बु., ता.पाचोरा, जि.जळगाव |
| १०. | श्री.स्वाती गंगाधर चामवाड | उच्च माध्यमिक आश्रमशाळा, बोरतळा पाटी, ता.उदगीर, जि.लातूर |
| ११. | श्री.अमोल भगवान बायस | |
| १२. | श्री.रमेश एल.गंगाधर | कनिष्ठ महाविद्यालय, पळशी तांडा, ता.किनवट, जि.नांदेड |
| १३. | श्री.शशिधर रेड्डी सोमा | |
| १४. | श्री.स्वामी चंद्रशेखर मृगेंद्र | उच्च माध्यमिक आश्रमशाळा, येड्राव, ता.मंगळवेढा, जि.सोलापूर |
| १५. | श्रीमती सोनाली सावंत | सदगुरु उच्च माध्यमिक आश्रमशाळा, इस्लामपूर, ता.वाळवा, जि.सांगली |
| १६. | श्रीमती तेजस्विनी जाधव | |
| १७. | श्री.राहुल राठी | कनिष्ठ महाविद्यालय, पाडेगाव, ता.खंडाळा, जि.सातारा |
| १८. | श्री.राजेंद्र धानुरे, | उच्च माध्यमिक आश्रमशाळा, मनोहरतांडा, ता.औसा, जि.लातूर |
| १९. | श्रीमती सावळकर | |

| | | |
|---|---|---|
| २०. | श्रीमती फुंदे वनमाला बद्रीनारायण | उच्च माध्यमिक आश्रमशाळा, शेकटे, ता.पार्थडी, जि.अहमदनगर |
| २१. | श्री.काळोखे अजय आबासाहेब | |
| २२. | श्री. मोहम्मद मुज्जमिल मुसा | उच्च माध्यमिक आश्रमशाळा, महागाव, ता.महागाव, जि.यवतमाळ |

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: CN = KAILAS TARACHAND SALUNKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT
Date: 2022.03.30 18:45:25 +05'30'

**(कैलास साळुंके)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**